**पणन हंगाम २०१८-१९ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान/ भरडधान्य खरेदीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी - १०१८/प्र.क्र.१८५/ ना.पु.२९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २९ सप्टेंबर, २०१८.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांक: खरेदी १११५/प्र.क्र.१७/ना.पु.२९, दि.१४ .०१.२०१६.

२) शासन शुद्धिपत्र क्रमांक : क्र. १०१४/२८/प्र.क्र. १७/नापु २९ दि. ०३.११.२०१७

**प्रस्तावना :-**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून शेतकऱ्यांना हमी भावापेक्षा कमी किंमतीने ( डिस्ट्रेस सेल ) धान्य विकावे लागू नये, म्हणून ही योजना राबविण्यात येते. त्यासाठी राज्य शासनाने नियुक्त केलेल्या अभिकर्ता संस्थांमार्फत ( बिगर आदिवासी क्षेत्रात महाराष्ट्र स्टेट को-ऑप. मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व आदिवासी क्षेत्रात, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक ) राज्यात एफ.ए.क्यु. (Fair average quality) दर्जाच्या धान व भरडधान्याची खरेदी करण्यात येते. वरील योजनेंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई अभिकर्ता संस्थांमार्फत मिलर्सकडून करुन घेऊन प्राप्त होणारा सी.एम.आर. (Custom milled rice) ( कच्चा तांदूळ ) भारतीय अन्न महामंडळाकडे जमा करण्यात येत होता. केंद्र शासनाने "धान" खरेदीकरीता राज्यात "विकेंद्रीत खरेदी योजना" (DCPS) लागू करणेबाबत केलेली शिफारस विचारात घेऊन हंगाम २०१६-१७ पासून विकेंद्रीत खरेदी योजना संपूर्ण राज्यात राबविण्याचा निर्णय राज्य शासनाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यामुळे सदर योजनेमध्ये तयार होणारा CMR राज्य शासनाने निर्धारित केलेल्या गोदामांमध्ये जमा करण्यात येत आहे. त्यानुसार सन २०१८-१९ या हंगामामध्ये धान/ भरडधान्य खरेदीसाठी सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पणन हंगाम २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाने किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान व ज्वारी, बाजरी व मका या भरड धान्याचे विहीत विनिर्देश तसेच किमान आधारभूत किंमती जाहीर केल्या आहेत. याशिवाय आधारभूत किंमतींचा शेतकऱ्यांना लाभ होण्याच्या दृष्टीने व त्यांना हमी भावापेक्षा कमी किंमतीने (डीस्ट्रेस सेल ) धान्य विकावे लागू नये, यासाठी राज्य स्तरावर नियंत्रण कक्ष उघडण्याच्या सूचना केंद्र शासनाने दिल्या आहेत. त्यानुसार, राज्यातील शेतक-यांना किमान आधारभूत किंमतीचा लाभ मिळावा या हेतूने राज्यात खरेदी केंद्रे सुरु करण्याकरिता व त्याठिकाणी धानाची व ज्वारी, बाजरी, मका या भरडधान्याची खरेदी करण्यासाठी खालील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

**१) खरेदी बाबत निर्णय:-**

अ) संपूर्ण महाराष्ट्र राज्यामध्ये केंद्र शासनाची "नोडल एजन्सी" म्हणून भारतीय अन्न महामंडळ (Food Corporation Of India) काम पाहील.

आ) प्रत्यक्ष खरेदीची प्रक्रिया बिगर आदिवासी क्षेत्रात "महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन, मुंबई " व आदिवासी क्षेत्रात "आदिवासी विकास महामंडळ, नाशिक " या अभिकर्ता संस्थांमार्फत करण्यात यावी.

इ) भारतीय अन्न महामंडळाच्या समन्वयाने राज्य शासनाने कार्यवाही करावयाची आहे. यास्तव महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन ,मुंबई व आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांनी राज्य शासनाचे मुख्य अभिकर्ता म्हणून काम पहावे.

ई) ज्वारी, बाजरी, मका या भरड धान्याच्या खरेदीच्या स्तरापर्यंतच्या सर्व प्रकारच्या कार्यवाहीची जबाबदारी मुख्य अभिकर्ता संस्थांवर राहील.

उ) खरेदी केलेली ज्वारी, बाजरी व मका हे भरड धान्य भारतीय अन्न महामंडळाच्या वतीने राज्य शासनाच्या गोदामामध्ये साठविण्यात यावे.

ऊ) ज्वारी, बाजरी व मका या धान्याची एकदा खरेदी होवून शासकीय गोदामात ही भरड धान्ये दर्जा तपासणी व वजन करुन जमा केल्यानंतर, अशा धान्याची साठवणूक, सुस्थितीत ठेवणे, गरजेनुसार जिल्हयांतर्गत वाहतूक / धुरीकरण इत्यादी गोष्टींची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

ऋ) खरेदी झालेले धान (भात) खरेदी अभिकर्त्यांनी स्वत:च्या गोदामात किंवा आवश्यकतेनुसार भाड्याच्या गोदामात साठवणूक करुन त्याची भरडाई करावी. केंद्र शासनाने ठरविलेल्या "परिशिष्ट I, IA, II, III, IV, V, VI, VII" मधील विनिर्देशानुसार (उताऱ्यानुसार व इतर अटी व शर्तीनुसार) धान भरडाई करुन शासनाच्या/जिल्हाधिकाऱ्यांचे निर्देशांनुसार तांदूळ शासनाच्या ( जिल्हा पुरवठा अधिकारी ) यांच्या गोदामात जमा करावा. धान खरेदीपासून साठवणूक, वाहतूक, सुरक्षितता, भरडाई व तांदूळ जमा करण्यापर्यंतची संपूर्ण जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील.

**२) अभिकर्ता नेमणूक:-**

उपरोक्त निर्णयानुसार, राज्यात खालीलप्रमाणे :-

अ) **बिगर आदिवासी क्षेत्रात** - खरीप पणन हंगाम २०१८-१९ मध्ये, किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत धान/भरडधान्य खरेदी करण्याकरिता, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन, मुंबई या अभिकर्ता संस्थेची या आदेशान्वये मुख्य अभिकर्ता म्हणून नेमणूक करण्यात येत आहे. सदर अभिकर्ता संस्थेने या क्षेत्रातील खरेदीची कार्यवाही विहित कालमर्यादेत करण्याची दक्षता घ्यावी.

आ) **आदिवासी क्षेत्रामध्ये** - खरीप पणन हंगाम २०१८-१९ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान / भरड धान्याची खरेदी

करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक या अभिकर्ता संस्थेची या आदेशान्वये मुख्य अभिकर्ता म्हणून नेमणूक करण्यात येत आहे. सदर अभिकर्ता संस्थेने या क्षेत्रातील खरेदीची कार्यवाही विहीत कालमर्यादेत करण्याची दक्षता घ्यावी.

### ३) <u>आधारभूत किंमती, सर्वसाधारण गुणवत्ता व दर्जा:-</u>

| पीक | | आधारभूत किंमत (रुपये) | शेतकऱ्यांना प्रत्यक्ष द्यावयाचा दर (रुपये) |
|---|---|---|---|
| धान/भात (एफ.ए.क्यू.) | अ) साधारण | १७५० | १७५० |
| | ब) "अ" दर्जा | १७७० | १७७० |
| भरडधान्य | ज्वारी (संकरित) | २४३० | २४३० |
| | ज्वारी (मालदांडी) | २४५० | २४५० |
| | बाजरी | १९५० | १९५० |
| | मका | १७०० | १७०० |

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेत केंद्र शासनाने विहित केलेल्या विनिर्देशात बसणारे FAQ दर्जाचेच धान / भरडधान्य खरेदी करणे आवश्यक आहे. **त्यानुसार अभिकर्ता संस्थांनी प्रशिक्षित ग्रेडर्सकडून तपासणीअंतीच धान/भरडधान्य खरेदी करावे.** कमी दर्जाचे धान/भरडधान्य खरेदी झाल्यास व त्यामुळे काही तोटा आल्यास किंवा कोणतीही समस्या उद्भवल्यास त्यासाठी अभिकर्ता संस्था पूर्णत: जबाबदार राहतील.

या धान्याची दर्जात्मक तपासणी शासनाकडून (जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयातील गुणवत्ता नियंत्रण प्रशिक्षित कर्मचारी) करण्यात येईल. दर्जा संबंधी खरेदी किंवा साठवणूकीच्या वेळी तपासणीमध्ये काही दोष आढळल्यास याबाबत अभिकर्ता संस्था संपूर्णपणे जबाबदार राहील. तसेच यामध्ये प्रकरणपरत्वे सुधारणात्मक कार्यवाही अभिकर्ता संस्थेनेच करावयाची असून अशा कार्यवाहीमुळे झालेल्या नुकसानीस अभिकर्ता संस्था संपूर्णत: जबाबदार असतील.

### ४) आर्द्रता :-

केंद्र शासनाने हंगाम २०१८-१९ करीता आर्द्रतेचे अधिकतम **प्रमाण धानासाठी १७% व ज्वारी, बाजरी, मका यासाठी १४% इतके** विहित केले आहे. या प्रमाणापेक्षा आर्द्रता जास्त आढळल्यास धान/ भरडधान्य खरेदी करण्यात येऊ नये. कोणत्याही परिस्थितीत जास्त ओलसर किंवा बुरशीयुक्त धान/भरडधान्य खरेदी करु नये. भरडधान्य स्वच्छ व कोरडे असून ते विक्री योग्य (मार्केटेबल) असल्याची अभिकर्ता संस्थांनी खातरजमा करावी. विहीत

प्रमाणापेक्षा जास्त आर्द्रता असलेले धान / भरडधान्य खरेदी केल्यास अभिकर्ता संस्थांनी वेळीच संबंधितांवर दंडात्मक कारवाई करावी.

५) <u>**सर्वसाधारण अटी व शर्ती:-**</u>

**५.१.खरेदी:-**

अ) मार्केटिंग फेडरेशन / आदिवासी विकास महामंडळ यांनी धान / भरडधान्य खरेदीची योजना त्वरीत कार्यान्वित करावी. त्यासाठी आवश्यक ठिकाणी खरेदी केंद्रे उघडणे, प्रशिक्षित कर्मचाऱ्यांची व्यवस्था करणे, खरेदी केंद्रावर धान्य वाळविणे, स्वच्छ करणे तसेच धान्याची नासधूस होवू न देणे यासाठी व खरेदी प्रक्रिया सुरळीतपणे होण्यासाठी आवश्यक त्या मूलभूत सुविधा (चाळणी, पंखे, ताडपत्री, पॉलिथिन शिट्स वगैरेसारखी आवश्यक साधने, आवश्यक ती वजनमापे, आर्द्रता मापक यंत्रे (मॉईश्चर मीटर) बारदाना, सुतळी इत्यादी) खरेदी केंद्रावर उपलब्ध करुन देण्याची खबरदारी दोन्ही खरेदी अभिकर्ता संस्थांनी घ्यावी.

आ) खरेदी करावयाच्या धान / भरडधान्याच्या दर्जावर नियंत्रण ठेवण्यासाठी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री ( Image Analysis kit ) व पुरेसे प्रशिक्षित ग्रेडर्स नेमण्याची संपूर्ण जबाबदारी मार्केटिंग फेडरेशन / आदिवासी विकास महामंडळ यांची राहील. खरेदी अभिकर्त्यांनी एफ.ए.क्यू. दर्जात न बसणाऱ्या धान / भरडधान्याची म्हणजेच /धान, ज्वारी, बाजरी व मका यांची खरेदी केली तर त्याची संपूर्ण जबाबदारी व येणाऱ्या नुकसानीची जबाबदारी ही सर्वस्वी खरेदी अभिकर्त्यांवर राहील. कमी दर्जाचे धान /भरडधान्य खरेदी करण्याचा प्रयत्न केल्यास अशा कर्मचाऱ्यांवर / ग्रेडर्सवर अभिकर्ता संस्थांनी दंडात्मक कारवाई करावी.

इ) आधारभूत किंमत खरेदी योजना ही शेतकऱ्यांच्या हितासाठी असल्याने धान / भरडधान्य खरेदी करताना या शासन निर्णयातील अनुक्रमांक ७ येथील कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

**५.२ बारदाना खरेदी:-**

अ) दोन्ही अभिकर्ता संस्थांना संपूर्ण हंगामाकरिता लागणारा बारदाना त्यांनी केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन खरेदी करावा.

आ) केंद्र शासनाने निश्चित केलेल्या दराने किंवा प्रत्यक्ष खरेदीसाठी झालेला खर्च, यापैकी जो कमी असेल त्या दराने सी.एम.आर.साठी लागणाऱ्या बारदानाची रक्कम अभिकर्ता संस्थांना देय असेल.

इ) भरडाईसाठी गिरणीमालकांना धान देताना धानाच्या गोण्या प्रमाणितच असल्या पाहिजेत. अशा प्रमाणित १०% गोण्यांचे चाचणी वजन करुन गिरणीमालकांना धान द्यावे. तपासणीदरम्यान गोण्या प्रमाणित नसल्याचे आढळल्यास संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांच्यावर दंडात्मक कारवाई करण्यात यावी.

ई) तांदुळ जमा करण्यासाठी वापरावयाचा बारदाना केंद्र शासनाच्या निर्देशानुसार असावा. भरडाईनंतर प्राप्त झालेला तांदूळ भरुन शिल्लक राहणारा बारदाना अभिकर्ता संस्थांनी मिलर्सकडून परत घेऊन स्वत:कडे ठेवावा. त्यापोटी, अभिकर्ता संस्थेस केंद्र शासनाने ठरविलेल्या दराने बारदाना घसारा देय राहील. कोणत्याही परिस्थितीत सदर शिल्लक बारदाना मिलर्सला विल्हेवाटीसाठी देऊ नये. तसे आढळल्यास अभिकर्ता संस्थेच्या संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करावी.

उ) त्याचप्रमाणे, शासनपत्र क्रमांक:खरेदी१८०३/१५६४/प्र.क्र.३४९७/ना.पु.२९, दिनांक ०३ नोव्हेंबर, २००३ अन्वये कळविल्या नुसार "अ" दर्जाचे तांदूळाचे गोणीवर इंग्रजीतील कॅपिटल लेटर "A", तर सर्वसाधारण (Common) दर्जाचे तांदूळाचे गोणीवर "C" असे अक्षर मार्किंग करावे.

ऊ) धान खरेदी करण्यासाठी एकदा वापरलेला बारदाना पुन्हा धान खरेदीसाठी वापरताना तो बुरशीयुक्त, फाटलेला, तुटलेला किंवा विरलेला नसावा. त्याचबरोबर ५० किलो क्षमतेच्या बारदान्याचे वजन ५०० ग्रॅमपेक्षा कमी असू नये. असे कोणत्याही तपासणीच्या वेळी आढळल्यास जबाबदार असलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांच्यावर अभिकर्ता संस्थेने तात्काळ कारवाई करावी.

**धान/सीएमआर व भरडधान्य खरेदीसाठी बारदान्याचा वापर खालीलप्रमाणे करावा:-**

**धान, सी.एम.आर.तांदुळ, भरडधान्य**:- धान, भरडधान्य व सी.एम.आर. साठवणूकीकरिता बारदान्याचा वापर करताना काटेकोरपणे केंद्र शासनाचे निकष पाळणे आवश्यक आहे. वापरण्यात येणाऱ्या बारदान्याची प्रत केंद्र शासनाने निश्चित केल्यानुसार नसल्याचे आढळल्यास त्यास अभिकर्ता संस्था जबाबदार राहील, व संबंधित अधिकाऱ्यांवर तात्काळ कारवाई करणे बंधनकारक राहील.

**५.३ प्रसिध्दी :-**

अ) खरेदी केंद्रावर फक्त खरेदी किंमतीबद्दल दरफलक न लावता किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत असलेले दर्जा, विनिर्देश, खरेदी केंद्रे इत्यादिची माहितीदेखील प्रदर्शित करावी. शेतकऱ्यांना निश्चितपणे लक्षात येण्यासाठी त्यासंबंधातील सूचना केवळ इंग्रजीमध्येच न देता त्या मराठीत अनुवाद करुन देण्यात याव्यात.

आ) एफ. ए. क्यू. दर्जाची मानके ठळकपणे फलकावर प्रत्येक खरेदी केंद्राच्या ठिकाणी प्रदर्शित करण्यात यावीत.

इ) सदर दर, दर्जा, खरेदी केंद्रे दर्शविणारे फलक सर्व कृषि उत्पन्न बाजार समिती, ग्राम पंचायत, तहसिल कार्यालय, पंचायत समिती कार्यालय इत्यादी ठिकाणी दर्शनी भागावर लावण्याच्या सक्त सूचना जिल्हाधिकाऱ्यांनी सर्व संबंधितांना द्याव्यात.

ई) कोणत्याही परिस्थितीत नॉन एफ.ए.क्यू. दर्जाचे धान्य खरेदी केले जाणार नाही. धान / भरडधान्याचे एफ.ए.क्यू. विनिर्देश, आधारभूत किंमती इत्यादी आवश्यक बाबींना स्थानिक वर्तमानपत्रे व इतर प्रसार माध्यमातून अभिकर्ता संस्थांनी व जिल्हाधिकाऱ्यांनी व्यापक प्रसिध्दी दयावी.

उ) खरेदी केंद्रे व प्रत्येक खरेदी केंद्रास जोडण्यात आलेल्या गावांची नावे यासंबंधी पुरेशी प्रसिध्दी देण्याबाबत जिल्हाधिकारी आणि खरेदी अभिकर्ता संस्थांनी खबरदारी घ्यावी.

ऊ) रोज सायंकाळी खरेदी केंद्र बंद झाल्यानंतर खरेदी केंद्रावर आणलेले, परंतु खरेदी न झालेले धान/भरडधान्य सांभाळण्याची जबाबदारी संबंधित शेतकऱ्याचीच राहील, अशी व्यापक प्रसिध्दी द्यावी.

**५.४ तपासणी:-**

अ) भारतीय अन्न महामंडळाचे/राज्य शासनाचे अधिकारी खरेदी केंद्रांना भेटी देऊन नियमितपणे विहित पध्दतीने खरेदी होत आहे किंवा नाही याची तपासणी करतील आणि त्यांनी दिलेला सल्ला विचारात घेऊन खरेदी अभिकर्ता संस्थांनी त्याप्रमाणे सुधारीत कार्यवाही / उपाययोजना करणे आवश्यक राहील. तसेच त्याबाबतचा कार्यपूर्ती अहवाल त्या अधिकाऱ्यास तसेच शासनास सादर करणे अभिकर्ता संस्थांना बंधनकारक राहील.

आ) जिल्हाधिकाऱ्यांनी धान/भरडधान्य खरेदीच्या कालावधीत दर्जा नियंत्रण व दक्षता पथकाची स्थापना करावी. या पथकाद्वारे विशेष मोहिम राबवून नॉन एफ.ए.क्यू. धान/भरडधान्य खरेदी होण्यास जबाबदार असणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करावी.

इ) ज्या बारदानांमध्ये धान/भरडधान्य भरलेले आहे, ती बारदाने केंद्र शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या परिमाणानुसार आहेत अथवा नाहीत याची तपासणी जिल्हा पुरवठा अधिकारी व अभिकर्ता संस्था यांच्या प्रतिनिधींनी एकत्रितरित्या करावी. याबाबतच्या नोंदी खरेदी केंद्रावर जतन कराव्यात. या तपासणीत केंद्र शासनाच्या बारदानांविषयीची नामांकने पूर्ण करत नसलेले बारदाने दिसून आल्यास ती नाकारावीत. कमी प्रतीचे बारदान वापरण्यात आल्याबाबत कोणतीही तक्रार शासनाकडे येणार नाही, याची दक्षता अभिकर्ता संस्थांनी घ्यावी. अशा प्रकारच्या

तक्रारी शासनाकडे प्राप्त झाल्यास त्या आधारे शासनस्तरावरुन तात्काळ तपासणी करण्यात यावी आणि त्या तपासणी अहवालाच्या आधारे अभिकर्ता संस्थांनी केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करणे अभिकर्ता संस्थांना बंधनकारक राहील.

ई) दक्षता पथक / जिल्हा स्तरावरील अधिकाऱ्यांनी केलेल्या तपासणीचा अहवाल दर आठवड्याला शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

**५.५ <u>इतर</u>**

अ) उप अभिकर्त्यांची नेमणूक खरेदी अभिकर्त्यांने स्वत:च्या जबाबदारीवर करावी. जिल्हाधिकाऱ्यांनी उप अभिकर्त्यांना प्राधिकारपत्रे देऊ नयेत. उप अभिकर्त्याच्या नेमणूकीशी शासनाचा काहीही प्रत्यक्ष संबंध राहणार नाही, याची नोंद घ्यावी.

आ) शेतकऱ्याने उत्पादित केलेल्या उत्पादनाची महाराष्ट्र कृषि उत्पन्न खरेदी (नियमन) नियम,१९६३ च्या नियम ३२ (ड) अन्वये कृषि उत्पन्न बाजार समितीच्या क्षेत्रात केंद्र शासनाच्या किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत जाहीर करण्यात आलेल्या हमी भावापेक्षा कमी दराने खरेदी केली जाणार नाही, याबाबत बाजार समितीने दक्षता घेणे आवश्यक आहे. त्यानुसार "बाजार समितीने अशा प्रकारांना आळा घातला नाही तर त्यांच्याविरुध्द उपरोक्त नियमांच्या नियम ४५ अन्वये शासन योग्य ती कारवाई करु शकेल." ही बाब संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या क्षेत्रातील सर्व कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या नजरेस आणून द्यावी. किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत जाहीर केलेल्या धान्याचा दर्जा, विहित विनिर्देश व किंमतीबाबतचे फलक ठळक अक्षरात दर्शनी भागात लावण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी कृषि उत्पन्न बाजार समित्यांना सक्त सूचना द्याव्यात व बाजार समित्यांनी त्याची काटेकोर अंमलबजावणी करावी. एफ.ए.क्यू.दर्जाचे धान / भरडधान्याचे हमी भावापेक्षा कमी भावाने व्यवहार होणार नाहीत, याची दक्षता घ्यावी.

इ) पूर्वानुभवानुसार कृषी उत्पन्न बाजार समितीच्या क्षेत्रात आधारभूत किंमतीपेक्षा कमी भावाने झालेल्या खरेदी संदर्भात केंद्र शासनाकडून राज्य शासनाकडे कारणमिमांसा विचारण्यात येते व याबाबत संबंधितांचा खुलासा मागविल्यावर बहुतांशी अशी खरेदी नॉन एफएक्यू दर्जाच्या धान / भरडधान्याची झालेली असल्याचे दिसून येते. मात्र, अशा कमी दराने होणाऱ्या खरेदी व्यवहाराबाबत कृषी उत्पन्न बाजार समित्यांनी संबंधिताना खरेदी विक्री दरांची माहिती देताना / अहवाल पाठविताना एफएक्यू / नॉन एफएक्यू दर्जाबाबत विर्निदिष्टपणे माहिती न पुरविल्यामुळे बहुतांशी प्रकरणात केंद्र शासनाकडून राज्याकडे पत्रव्यवहार करण्यात येतो. यास्तव, कोणत्याही बाजार समित्यांनी त्यांच्या क्षेत्रात खरेदी झालेल्या धान तसेच भरड धान्याचे दर कोणत्याही माध्यमाद्वारे प्रसिध्द करताना किंवा कळवितांना खरेदी विक्रीचे दराबरोबरच एफएक्यू व नॉन एफएक्यू दर्जाबाबतसुध्दा कोणत्याही परिस्थितीत उल्लेख करावा अशाही सक्त

सूचना सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या क्षेत्रातील कृषी उत्पन्न बाजार समित्यांना दयाव्यात.

ई) आधारभूत किंमत योजनेखाली ज्वारी,बाजरी, मका व धान खरेदी करण्यासाठी महाराष्ट्र स्टेट को- ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांना जो अनुषंगिक खर्च द्यावयाचा आहे, त्याबाबत राज्य शासन, केंद्र शासनाशी चर्चा करुन स्वतंत्रपणे निर्णय घेईल व हा निर्णय स्वतंत्ररित्या कळविण्यात येईल.

**उ) वरील योजनेंतर्गत खरेदी केलेल्या भरड धान्य व धानामधील तूट /घट केंद्र शासनाने मान्य केली तर त्याप्रमाणातच अनुज्ञेय राहील.**

६) **<u>खरेदी केंद्रे:-</u>**

जिल्हाधिकाऱ्यांनी निर्देशिल्याप्रमाणे खरेदी अभिकर्ता संस्थांनी आवश्यक त्या ठिकाणी धान, ज्वारी, बाजरी व मका यांची खरेदी करण्यासाठी खरेदी केंद्रे उघडावीत. २०१७-१८ या हंगामात एकूण ६९५ खरेदी केंद्र उघडण्यासाठी मान्यता देण्यात आली होती. त्यापैकी ४३७ एवढयाच खरेदी केंद्रावर आवक झालेली आहे. त्यामुळे २५८ एवढी केंद्रे कार्यरत नसली तरी त्याठिकाणी साधनसामग्री व मनुष्यबळाचा पुरवठा करावा लागला. ही बाब विचारात घेता आनावश्यक खरेदी केंद्र उघडली जाणार नाहीत, याची दक्षता संबधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

७) **<u>खरेदी पध्दत:-</u>**

प्रत्येक गाव एका विशिष्ट खरेदी केंद्रास जोडण्यात यावे. सदर गावातील शेतकरी जर दुसऱ्या खरेदी केंद्रावर धान / भरडधान्य घेवून गेला तर, त्या केंद्रावर त्याचे धान / भरडधान्य खरेदी करु नये. खरेदी केंद्रे व प्रत्येक खरेदी केंद्रास जोडण्यात आलेल्या गावांची नावे यासंबंधी पुरेशी प्रसिध्दी देण्याबाबत जिल्हाधिकारी आणि खरेदी अभिकर्ता संस्थांनी खबरदारी घ्यावी. शेतकऱ्यांकडील धान /भरडधान्य खरेदी करताना Online खरेदी पध्दत सुरु करण्यात आली आहे. त्याकरीता संबंधित शेतकऱ्यांची नोंदणी करणे आवश्यक राहील. त्याकरिता Online नोंदणी, आधार क्रमांक व बचत बँक खाते क्रमांक नोंदणी करण्यात येत आहे. सदर Online खरेदी करीता हंगाम २०१८-१९ साठी NeML NCDEX Group Company यांचे Platform वर नोंदणी करुन केंद्र शासनाच्या निर्देशांप्रमाणे त्या नोंदी PFMS (Public Fund Monitoring System) करणे अनिवार्य आहे. शेतकऱ्यांकडील जमिनीबाबतचा ७/१२ चा उतारा पाहूनच धान / भरडधान्य खरेदी करण्यात यावे. सदरहू उताऱ्यात ज्वारी व अन्य धान्य/ धानाखालील क्षेत्रे याची नोंद आहे, याची खात्री करुन घ्यावी. तसेच ७/१२ उताऱ्यासंबंधीची नोंद पावतीच्या मागील बाजूस घ्यावी. ७/१२ उताऱ्याची प्रत शेतकऱ्यांना परत करु नये. खरेदी केंद्रावर विक्रीसाठी शेतकऱ्यांने आणलेल्या धान /भरडधान्याच्या अनुषंगाने

Online नोंदी करण्यात याव्यात तसेच गावनिहाय रजिष्टर तयार करावे. त्यामध्ये १) शेतकऱ्याचे नाव २) सर्व्हे / गट क्रमांक व क्षेत्रफळ, ३) केंद्रात विक्रीस आणलेले धान /ज्वारी , बाजरी व मका या माहितीचा समावेश असावा. त्यामुळे पुन्हा धान्य आणल्याबरोबर या नोंदवहीवरुन पूर्वी दिलेला ७/१२ चा उतारा काढून, आणलेले शेतकऱ्याचे धान्य त्याच्या स्वत:च्या उत्पादनातील आहे याची खात्री करुन घेता येईल. ट्रकने वा तत्सम वाहनातून आणलेले धान / भरडधान्य स्विकारण्यापूर्वी सदर धान / भरडधान्य खऱ्या शेतकऱ्याचेंच आहे याची पूर्णपणे खात्री करुन घ्यावी. काही ठिकाणी धान्याखालील क्षेत्र व सरासरी उत्पादकता याचा विचार न करता फार मोठया प्रमाणावर (अप्रत्यक्षपणे व्यापाऱ्यांचे) धान्याची खरेदी केली जाते असे निदर्शनास आले आहे. यास्तव शेतकऱ्यांचे ७/१२ उताऱ्यानुसार पीकाखालील क्षेत्र, या वर्षीची पिक परिस्थिती (पैसेवारी) पीकाचे सरासरी उत्पादन या बाबी विचारात घेऊन, धान / भरडधान्य खरेदी करण्यात यावे. रोज सायंकाळी खरेदी केंद्र बंद झाल्यानंतर खरेदी केंद्रावर आणलेले, परंतु खरेदी न झालेले धान / भरडधान्य सांभाळण्याची जबाबदारी संबंधित शेतकऱ्याचीच राहील, अशी प्रसिध्दी द्यावी. व्यापाऱ्यांकडून गतवर्षीचे धान / भरडधान्य पुन्हा खरेदी केंद्रावर विकले जाण्याची शक्यता विचारात घेऊन गतवर्षाचे जुने धान / भरडधान्य कोणत्याही स्थितीत खरीदले जाणार नाही व केवळ शेतकऱ्यांकडून उत्पादित झालेले नवे धान /भरडधान्यच खरेदी केले जाईल याची अभिकर्ता संस्थांनी विशेष खबरदारी घ्यावी. जुने किंवा बिगर शेतकऱ्यांकडून धान / भरडधान्य खरेदी झाल्यास त्याची पूर्ण जबाबदारी अभिकर्ता संस्थांवर राहील.

**८) खरेदी केलेल्या भरड धान्याची (ज्वारी,बाजरी व मका ) साठवणूक :-**

अ) अभिकर्ता संस्थांनी विनिर्देशानुसार खरेदी केलेले ज्वारी, बाजरी व मका हे भरडधान्य राज्य शासनाच्या प्रतिनिधीने, शक्यतो त्याच दिवशी केंद्राजवळच्या गोदामात पूर्ण वजन करुन व दर्जाची खात्री करुन जिल्हाधिकारी यांनी ठरविल्याप्रमाणे ताब्यात घ्यावे व त्याची नोंद गोदाम लेख्यामध्ये नियमितपणे घ्यावी. त्याकरिता आवश्यकता भासल्यास साठवणूकीसाठी वखार महामंडळाची / सहकारी संस्थांची खाजगी गोदामे भाडयाने घेण्यात यावीत. साठा उघडयावर साठविण्याची गरज उद्भवल्यास ते साठविण्यापूर्वी अशा अन्नधान्याच्या थप्प्याखाली व आजूबाजूस ड्रेनेज पुरवून त्यावरुन पूर्णपणे पुरेशा ताडपत्र्यांनी झाकून ठेवण्याची व्यवस्था करावी. तसेच गरजेनुसार नियमित ठेकेदाराकडून वेळीच धुरीकरण करुन धान्याचे किडीपासून संरक्षण करावे. कोणत्याही परिस्थितीत उघडयावर साठविण्यात आलेला धान्याचा साठा पावसामुळे भिजणार नाही व धान्य थप्प्यांना खालून किंवा बाजूने ओल लागणार नाही व पावसाळयात सुध्दा असा साठा उघडयावर राहीला तरी धान्य खराब

होणार नाही याची दक्षता घेवूनच गोदामाबाहेर असलेल्या धान्याच्या सुरक्षिततेची प्रथम पासूनच व्यवस्था करावी. याबाबत शासन पत्र, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्रमांक : संकीर्ण - १२९८ / १५ / प्र. क्र. २५७९ / ना. पु. २९, दिनांक ३ ऑगस्ट, १९९८ (परिशिष्ट VII) अन्वये विहित केलेल्या संहितेचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

आ) जिल्हाधिकारी / जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी भरडधान्य ताब्यात घेतांना ते FAQ दर्जाचे आहे, याची प्रत्यक्ष खातरजमा करावी. तसेच, याबाबतचे प्रमाणपत्र भारतीय अन्न महामंडळाकडे पाठवावे.

इ) भरडधान्याचा खरेदी कालावधी संपल्यानंतर एका आठवडयाच्या आत गोदामनिहाय साठविण्यात आलेल्या भरडधान्याचा (ज्वारी, बाजरी, मका) तपशील शासनास सादर करण्यात यावा. यासोबत सदरचे भरडधान्य FAQ दर्जाचे असल्याबाबतच्या प्रमाणपत्राची प्रत देखील सादर करण्यात यावी.

९) **धानाची साठवणूक व भरडाई :-**

अ) धानाचे बाबतीत साठवणूकीची जबाबदारी संबंधित अभिकर्ता संस्थांची राहील. खरेदी केलेले धान अभिकर्ता संस्थांच्या ताब्यातच राहील. त्यासाठी आवश्यकतेप्रमाणे संबंधित अभिकर्ता संस्थांनी गोदामे भाडयाने घ्यावीत. धानाची साठवणूक, सुरक्षितता, वाहतूक, भरडाई, संबंधित जिल्हाधिकारी/ जिल्हा पुरवठा अधिकारी तांदूळ जमा करेपर्यंत सर्व जबाबदारी अभिकर्ता संस्थांची असून ती कामे अभिकर्ता संस्थांनी करावयाची आहेत. धान जिल्हाधिकाऱ्यांनी ताब्यात घ्यावयाचे नाही. अभिकर्ता संस्थांनी विहित पध्दतीने मिलर्सची नेमणूक करुन केंद्र शासनाच्या अटी व शर्तीनुसार धानाची भरडाई करुन घ्यावयाची आहे व उत्पादित तांदूळ जिल्हाधिकाऱ्यांच्या शासकीय गोदामात जमा करावयाचा आहे. याबाबत केंद्र शासन ठरवेल ते विनिर्देश भरडाई, साठवणूक आकार, वाहतूक खर्च व इतर अटी आणि शर्ती लागू राहतील. धान भरडाईबाबतच्या सविस्तर सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

आ) केंद्र शासनाने भरडाई केलेल्या धानाच्या साठवणूकीसाठी दरमहा (२ महिन्यांसाठी) रु. २.४० प्रति क्विंटल एवढा गोदाम भाडे दर मंजूर केलेला आहे. धान भरडाई कोणत्याही परिस्थितीत तात्काळ सुरु करण्याची जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील. कोणत्याही परिस्थितीत दोन महिन्यांचेवर धान गोदामात राहणार नाही याची सुध्दा दक्षता घ्यावी.

इ) भरडाईसाठी मिलर्सना धान तात्काळ उपलब्ध करुन देणे व धान भरडाई करुन केंद्र शासनाचे अटी व शर्तीनुसार तांदुळ (फक्त कच्चा) विहित कालावधीत जिल्हाधिकारी यांच्या गोदामात जमा करणे, याची संपूर्ण

जबाबदारी अभिकर्ता संस्थाची राहील. याबाबत कोणत्याही कारणामुळे विलंब लागल्यास त्या विलंबासाठी होणाऱ्या कारवाईची जबाबदारी अभिकर्ता संस्थाची राहील, याची नोंद घेऊन अभिकर्ता संस्थांनी धानाचे दर्जाबद्दल विशेष दक्षता घ्यावी. धान भरडाईअंती प्राप्त होणाऱ्या सीएमआर तांदूळासाठी कलर कोडींग (Colour coding) केलेल्या गोण्या वापरण्याबाबत केंद्र शासनाने दिलेल्या सूचनांची अंमलबजावणी करण्याविषयी परिशिष्ट "VI" मधील शासन पत्र क्रमांक: खरेदी १०१८/प्र.क्र.११८/ नापु-२९, दि. ०८ मे, २०१८ व पत्र क्रमांक: खरेदी १०१७/प्र.क्र.१०३/ नापु-२९, दि. १४ सप्टेंबर, २०१७ नुसार सर्व संबंधितांनी कार्यवाही करावी. (केंद्र शासनाच्या दिनांक १२ एप्रिल, २०१८ व दिनांक २५ ऑक्टोबर, २०१७ च्या पत्रांसह)

**१०) खरेदीचा कालावधी:-**

**धान -खरीप पणन हंगाम - दि. १ ऑक्टोबर, २०१८ ते ३१ मार्च, २०१९**
**धान- रब्बी ( उन्हाळी ) पणन हंगाम - दि. १ मे, २०१९ ते ३० जून, २०१९**
**भरडधान्य ( मका /ज्वारी / बाजरी ) - दि. १ नोव्हेंबर, २०१८ ते ३१ डिसेंबर, २०१८**

**११) धान्याची किंमत प्रदान करणे व खर्चाची प्रतिपूर्ती:-**

अ) लाभार्थ्याचे प्रदान ऑनलाईन करण्याबाबत केंद्र शासनाचे निर्देश आहेत. ही बाब विचारात घेता अभिकर्ता संस्थांनी त्यांच्या मुख्यालयातून थेट शेतकऱ्यांच्या खात्यामध्ये खरेदी केलेल्या धान व भरडधान्यांची रक्कम अदा करावी. कोणत्याही परिस्थितीत सदर रक्कम धान/भरडधान्य खरेदी केलेल्या दिवसापासून पुढील ७ दिवसांपर्यंत शेतकऱ्यांच्या खात्यामध्ये जमा झाली पाहिजे.

आ) शासनाच्या अभिकर्ता संस्थांनी शेतकऱ्यांकडून खरेदी केलेल्या धान व भरडधान्याची किंमत शेतकऱ्यांना त्वरित प्रदान करावी. भरड धान्याच्या बाबतीत खरेदी अभिकर्त्यांना वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या कार्यालयाने, अभिकर्ता संस्थांकडून साप्ताहिक खरेदी विवरणपत्र व धान्य शासकीय गोदामात प्राप्त झाल्याचा पुरावा प्राप्त होताच, खरेदी केलेल्या भरड धान्याची पूर्ण किंमत प्रदान करावी. ही रक्कम विनाविलंब अदा करणे वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयाला शक्य व्हावे म्हणून भरड धान्याची स्वीकृती पत्रे खरेदी अभिकर्ता संस्थांनी ताबडतोब दर आठवडयाला वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयास सादर करावीत.

इ) अभिकर्ता संस्थांनी आधारभूत किंमत योजनेखाली खरेदी केलेल्या धानाचे साप्ताहिक विवरणपत्र जिल्हा पुरवठा अधिकारी/सहायक जिल्हा पुरवठा

अधिकारी यांचे प्रति स्वाक्षरीसह प्राप्त होताच, त्याआधारे वित्तीय सल्लागार व उप सचिव यांनी दोन्ही **अभिकर्ता संस्थांना प्रति क्विंटल १७५०/-रुपये प्रमाणे** रक्कम अदा करावी. अनुषंगिक खर्चाची रक्कम भात भरडाई करुन तांदूळ शासकीय गोदामात जमा केल्यानंतर केंद्र शासनाचे मंजूरीनुसार आदेश काढल्यानंतर अदा करावी.

ई) अभिकर्ता संस्थांनी या योजनेंतर्गत खरेदी केल्या जाणाऱ्या धान / भरड धान्यासाठी संबंधित शेतकऱ्यांच्या ७/१२ उताऱ्याच्या प्रती तसेच इतर मूळ अभिलेखे त्यांच्या कार्यालयात ठेवावे. धान/ भरडधान्य खरेदी प्रदानाच्या संदर्भात अतिप्रदान किंवा चुकीची देयके सादर करुन रकमा अदा केल्या जाणार नाहीत याबाबतची सर्वस्वी जबाबदारी अभिकर्ता संस्थेची राहील. अभिकर्ता संस्थेने या योजनेंतर्गत खरेदी केल्या जाणाऱ्या धान / भरडधान्यासाठी वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालयात प्रतिपूर्तीचे दावे सादर करतांना साप्ताहिक खरेदी विवरणपत्र, फॉर्म 'बी ' व ' सी ' सोबत खालीलप्रमाणे प्रमाणपत्र सादर करावे:-

"प्रमाणित करण्यात येते की, दाव्यात दर्शविलेल्या रकमांचे यापूर्वी प्रदान करण्यात आलेले नाही. सदर दाव्यातील परिगणना खरेदी केंद्रे / संबंधित कार्यालयात ठेवण्यात आलेल्या मूळ अभिलेख्यावरुन पडताळणी करण्यात आलेली असून अनुज्ञेय रकमांचे दावे सादर करण्यात आलेले आहेत. सदर प्रदानात जादाचे किंवा चुकीचे प्रदान झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील व त्यानुसार वसूल प्राप्त रकमा तात्काळ वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालयास परत करण्यात येतील किंवा पुढील दाव्यातून वसूल करण्यात याव्यात."

उ) केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेल्या निदेशांनुसार महिनानिहाय साठा विवरणपत्र , बारदाना लेखे, गोदामभाडे करार, वाहतूक भाडेदरपत्रक इ. आवश्यक दस्तऐवज अभिलेखित करावेत.

ऊ) दोन्ही अभिकर्ता संस्था, आवश्यक असल्यास भारतीय रिझर्व्ह बँकेकडून सवलतीच्या दराने कॅश क्रेडीट लिमिट मिळण्यासाठी प्रस्ताव करु शकतील. (विशेषत: धान खरेदीसाठी) असा प्रस्ताव त्यांनी पाठविल्यास केंद्रीय अन्न मंत्रालयामार्फत अशी कॅश क्रेडिट मिळवून देण्यासाठी हा विभाग शिफारस करेल.

ऋ) अभिकर्ता संस्थांनी आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत भरडधान्य व धानाच्या खरेदीबाबतचे स्वतंत्र लेखे ठेवणे व अनुषंगिक माहिती सादर करण्याबाबतच्या सविस्तर सूचना वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्या कार्यालयाकडून तात्काळ देण्यात याव्यात.

१२) **कंट्रोल रुम:-**

अ) आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरेदी करण्यात येणाऱ्या धान / भरड धान्याचा (ज्वारी,बाजरी व मका) नियमित अहवाल केंद्र शासन/ भारतीय अन्न महामंडळास पाठविण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयामार्फत करण्यात यावी.

सदर योजना राबविताना केंद्रीकृत नियंत्रण रहावे याकरिता खालीलप्रमाणे **कंट्रोल रुमची स्थापना** करण्यात येत आहे.

अवर सचिव, MSP, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय ( विस्तार ),मुंबई- ४०० ०३२. E-mail: deepak.kendre@nic.in

Fax no. ०२२ २२०२३१६४

ब) अभिकर्ता संस्थांनी दररोजचा जिल्हानिहाय खरेदी अहवाल सायंकाळी ५.३० पर्यंत वरील कंट्रोल रुमला व वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयास पाठवावा. संबंधित जिल्हाधिकारी व खरेदी अभिकर्ता संस्थांनी दर शनिवारी सायंकाळपर्यंत खरेदी करण्यात आलेल्या धान व भरडधान्य खरेदीचा साप्ताहिक अहवाल परिशिष्ट "V" मधील नमुन्यात वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, मुंबई यांच्याकडे पाठवून त्याची प्रत सह सचिव (किमान आधारभूत किंमत योजना) यांना द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२९१६५३४५०४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.09.29 16:58:25 +05'30'

**(सतिश सुपे)**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्र :- परिशिष्ट I,IA, II, III,IV,V,VI व VII

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,कनमुर हाऊस, मुंबई-४०० ००१.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., आदिवासी विकास भवन,जुना आग्रा रोड, नाशिक - ४२२ ००१.

३) जिल्हाधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे,पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग,

४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा मुंबई.

५) जिल्हा पुरवठा अधिकारी,नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
६) सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी,नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे,पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
७) सर व्यवस्थापक (महाराष्ट्र) ,भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, दत्तपाडा रोड, राजेंद्र नगर, बोरीवली (पूर्व), मुंबई-४०००६६
८) उपआयुक्त (पुरवठा), सर्व विभाग.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद
२) सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य.
३) अपर मुख्य सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती),
७) खाजगी सचिव, मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण), मंत्रालय, मुंबई-३२.
८) मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती),
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई. (१० प्रती)
१०) संचालक, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई
११) संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक

